भाषा संचालनालयातील भाषा उप संचालक
(अनुवाद व शब्दावली) गट-अ या पदावर
पदोन्नती

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः भासंप-२०१७/प्र.क्र.९१/आस्था-२

नवीन प्रशासन भवन, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३१ ऑक्टोबर, २०१९

## शासन निर्णय-

भाषा संचालनालयातील सहाय्यक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या पदावर कार्यरत असलेल्या श्रीमती विजया ल. डोनीकर यांना सातव्या वेतन आयोगानुसार अनुज्ञेय असलेल्या एस-२०: रु.५६१००-१७७५०० या वेतनमानातील भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) या संवर्गातील पदावर या आदेशाच्या दिनांकापासून निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून, पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना भाषा संचालनालय (मुख्यालय), मुंबई येथील रिक्त पदावर करण्यात येत आहे.

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निकालाच्या विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. या संबंधात सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-१६ब च्या क्र.बीसीसी-२०१७/प्र.क्र.३१२A/१६ ब, दि.२९.१२.२०१७ च्या पत्राद्वारे दिलेल्या सूचनांनुसार पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात व सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून, सहाय्यक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) या संवर्गाच्या सेवाजेष्ठता यादीमधील मागासवर्गीय कर्मचारी यांना यापूर्वीच्या टप्प्यावर शासन निर्णय दि.२५.०५.२००४ मधील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आलेले कर्मचारी वगळून विचाराधीन तात्पुरती पदोन्नती देण्यात आली आहे. याशिवाय प्रस्तुत पदोन्नती खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१. सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात राहील.
२. या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे त्यांना नियमित पदोन्नतीचे वा सेवाज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.
३. सदरची पदोन्नती त्यांच्याविरुद्ध कोणतीही न्यायिक/फौजदारी कार्यवाही सुरु नाही या धारणेच्या अधिन राहील.

संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना पदोन्नतीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. त्यांनी त्यांच्या पदोन्नतीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०३११६०७४७६२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH PARSHURAM KUDTARKAR

Digitally signed by MANGESH PARSHURAM KUDTARKAR
DN: CN = MANGESH PARSHURAM KUDTARKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MARATHI LANGUAGE
Date: 2019.10.31 17:08:19 +05'30'

**(मं.प.कुडतरकर)**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.
३. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (का-१२/का-१६ब), मंत्रालय.
४. प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक
५. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई.
६. विभागीय सहाय्यक भाषा संचालक, पुणे विभागीय कार्यालय, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. कोषागार अधिकारी, पुणे.
९. श्रीमती विजया ल. डोनीकर (भाषा संचालनालयामार्फत)
१०. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय.
११. निवड नस्ती.